**सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सर्वसाधारण) या योजनेअंतर्गत १३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टाखालील खर्चास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- मुरोनि-२०२४/प्र.क्र.१२३/उद्योग-७.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१/०३/२०२५.

**वाचा:-**

१) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/प्र.क्र.१२१/उद्योग-७, दिनांक ०१/०८/२०१९.

२) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१७७/उद्योग-७, दिनांक ३१/०८/२०१९.

३) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.योजना-२०१९/प्र.क्र.२३०/उद्योग-७, दिनांक२३/०१/२०२०.

४) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/प्र.क्र.१२१/उद्योग-७, दिनांक ११/११/२०२२.

५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/७/२०२४, दिनांक १२/०२/२०२५ व दिनांक १७/०३/२०२५.

६) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.आयएलई-२०२३/प्र.क्र.१४२/प्रशासन-३, दिनांक २४/०७/२०२३.

७) उद्योग सह संचालक (मुरोनिका), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ मुंरोनिका/ सर्व साधारण/ कार्यालयीन खर्च/ २०२४-२५/अ-८५७, दिनांक ०७/१०/२०२४.

८) उद्योग सह संचालक (मुरोनिका), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ मुंरोनिका/ सर्व साधारण/का.खर्च/२०२४-२५/A-११९ दिनांक १२/०२/२०२५.

९) उद्योग सह संचालक (मुरोनिका),उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ मुंरोनिका/ सर्व साधारण/का.ख.नि.वि./२०२४-२५/A-२४८ दिनांक १०/०३/२०२५.

१०) उद्योग सह संचालक (मुरोनिका),उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/मुंरोनिका/ कार्यालयीन खर्च/२०२४-२५/A-३५८ दिनांक २९/०३/२०२५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील शहरी व ग्रामीण क्षेत्रातील सुशिक्षित युवक-युवतींची वाढती संख्या व उद्योग, व्यवसाय क्षेत्रात राज्यात विविध क्षेत्रात स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी उपलब्ध होत आहेत. या स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी विचारात घेऊन उद्योजकतेला चालना देणारी व सर्जनशिलतेला कालानुरुप वाव देणारी 'मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम' (CMEGP) ही सर्वसमावेशक योजना दिनांक ०१/०८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील शहरी व ग्रामीण युवक-युवतींना स्वयंरोजगाराच्या विविध संधी उपलब्ध होण्यासाठी व योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय संनियंत्रण समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत.

२. सदर योजनेअंतर्गत राज्यातील युवक-युवतींना स्वयंपूर्ण / आत्मनिर्भर बनविण्याकरीता त्यांना स्वयंरोजगार प्रकल्प स्थापित करण्यासाठी राज्य शासनाकडून आर्थिक सहाय्य हे अनुदान स्वरुपात राज्य शासनाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून उपलब्ध करुन देण्यात येईल, असे राज्याच्या औद्योगिक धोरण- २०१९ मध्ये नमूद केले आहे. त्यानुसार सदर योजनेअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्ग व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी दिनांक २३/०१/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये नवीन लेखाशिर्ष उघडण्यात आले आहे. तसेच अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून उद्दीष्टांच्या प्रमाणानुसार तरतूद उपलब्ध करुन देण्यात येते.

३.	मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाची सुलभ अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने कर्ज प्रस्तावापासून अनुदान वितरणापर्यंत सर्व प्रक्रीया उद्योग विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयाच्या अंतर्गत कार्यरत जिल्हा उद्योग केंद्र तसेच खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचेअंतर्गत कार्यरत जिल्हा खादी व ग्रामोद्योग कार्यालय यांच्यामार्फत पूर्णतः ऑनलाईन पद्धतीने करण्यात येत आहे. या प्रयोजनार्थ उद्योग संचालनालयाच्या संनियंत्रणाखाली महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र या संस्थेच्या सहयोगातून उद्योग संचालनालया अंतर्गत विशेष आयटी व समन्वय कक्ष स्थापन करण्या आला आहे. सदर कक्षामार्फत या कार्यक्रमाच्या पोर्टलचे निर्माण, देखरेख व दुरुस्ती, डेटाबेस व MIS सादरीकरण इत्यादी कामकाज करण्यात येते. सदर कक्षासाठीचा खर्च योजनेअंतर्गत उपलब्ध तरतूदीच्या अंतर्गत प्रशासकीय कारणासाठी राखून ठेवण्यात येणाऱ्या तरतूदीतून अदा करण्यात येतो. त्यानुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र (MCED) मार्फत स्थापित विशेष आयटी व समन्वय (CMEGP Cell) कक्षाच्या मुंबई व छत्रपती संभाजीनगर येथील प्रशासकीय खर्चाकरीता आवश्यक निधी रुपये ३६.०० लक्ष आणि महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र (MCED) मार्फत स्थापित विशेष आयटी व समन्वय कक्ष (CMEGP Cell) कक्षाकरिता लागणारी स्टेशनरी व इतर याकरीता झालेल्या खर्चासाठी आवश्यक रुपये १.५ लक्ष असा एकूण रुपये ३८.०० लक्ष एवढा निधी उद्योग संचालनालयाने दिनांक २९/०३/२०२५ रोजीच्या पत्रान्वये वितरणाकरीता उपलब्ध करून देण्याबाबत विनंती करण्यात आली आहे. त्यानुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेंतर्गत (सर्वसाधारण) कार्यालयीन खर्च (१३) या उद्दिष्टाखालील तरतुदीतून रुपये ३८.०० लक्ष एवढ्या निधीच्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेंतर्गत (२८५१ ६६४५) (सर्वसाधारण) १३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टाखाली अर्थसंकल्पीय तरतुदीतून खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे **रूपये ३८,००,०००/- (अक्षरी अडोतीस लक्ष रुपये फक्त)** एवढ्या निधीच्या खर्चास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | बाबनिहाय तपशील | रुपये |
|---|---|---|
| १ | महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र (MCED) मार्फत स्थापित विशेष आयटी व समन्वय (CMEGP Cell) कक्षाच्या मुंबई व छत्रपती संभाजीनगर येथील प्रशासकीय खर्चाकरीता आवश्यक निधी<br>(एप्रिल, २०२४ ते सप्टेंबर, २०२४)करीता रुपये २७,४०,६८१/-<br>रुपये २२,४१,१४५/- (ऑक्टो, २०२४ ते मार्च, २०२५) यापैकी उपलब्ध तरतुदीच्या मर्यादेत रुपये ९,०९,३१९/- | ३६,५०,०००/- |
| २ | महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र (MCED) मार्फत स्थापित विशेष आयटी व समन्वय कक्ष (CMEGP Cell) कक्षाकरिता लागणारी स्टेशनरी व इतर याकरीता<br>(एप्रिल, २०२४ ते सप्टेंबर, २०२४) | १,५०,०००/- |
| | **एकूण** | ३८,००,०००/- |

**२.**	सदर रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

**३.**	वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

a) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाची राज्यामध्ये अंमलबजावणी करणेबाबत दिनांक ०१/०८/२०१९ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून यामध्ये अर्ज प्रक्रिया व प्रकल्प मंजूरी अंतर्गत करावयाची कार्यवाही, योजनेची अंमलबजावणी यंत्रणा, अनुदान वितरण व विविध मंजूरीस्तव समिती यांची माहिती दिलेली आहे. तसेच दिनांक ११/११/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेची व्याप्ती वाढविण्यात आली आहे.

b) यापूर्वी सदर योजनेअंतर्गत प्राप्त झालेला निधी प्राधिकृत बँकेत जमा करण्यात येवून सदर निधी बँकेमार्फत लाभार्थ्यांच्या खात्यात जमा करण्यात येत आहे.

c) यापूर्वी सन २०२३-२४ या वर्षात वितरीत केलेल्या १०० टक्के निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झालेले आहे.

d) वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/महालेखापाल यांच्याकडून कोणतेही आक्षेप नाहीत.

e) सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

**४.** सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्र.के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योग, १०२ लघु उद्योग, (००) (२५) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) (२८५१ ६६४५), १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात येईल. तसेच सदर प्रयोजनार्थ होणारा प्रत्यक्ष खर्च निधी वितरणाच्या अधीन राहून करण्याची दक्षत घेण्यात येईल.

**५.** सदर शासन निर्णय प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (उद्योग) यांना दिनांक २४/०७/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०३३१२१५०३१३०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.31 21:51:09 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित.**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
७. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
८. सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र.
९. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-३,१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई -३२
१०. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (उद्योग-७).